# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
**शासन ज्ञापन क्रमांक- पोप्रमा-०९१६/प्र.क्र.६२१/एक/पोल-७.**

मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.

दिनांक : ३० मार्च, २०१७.

**विषय** :- पोलीस ठाणे, कोंढाळी, ता.काटोल, जि. नागपूर, येथे पोलीस अधिकारी यांच्याकरिता दोन व पोलीस कर्मचारी यांच्याकरिता २० निवासस्थाने यांचे बांधकाम करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**संदर्भ** :-

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१४/ प्र.क्र.४९/ १४/ विनियम, दिनांक ०५.०१.२०१५.

२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५.

३) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांच्या कार्यालयाचे पत्र क्र. पोमसं/ २७-बी/ २८-बी-२/ कोंढाळी/निवा.नागपूर-ग्रा./७४/२०१५, दिनांक १८.०८.२०१६.

**ज्ञापन** :-

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांनी, पोलीस ठाणे, कोंढाळी, ता.काटोल, जि. नागपूर, येथे पोलीस अधिकारी यांच्याकरिता दोन व पोलीस कर्मचारी यांच्याकरिता २० निवासस्थाने यांचे बांधकाम करण्याचा प्रस्ताव सादर केला आहे.

२. उक्त कामांसाठी सहायक अभियंता, श्रेणी-१, सार्वजनिक बांधकाम उप-विभाग, काटोल, यांनी सन २०१५-१६ च्या दरसूचीनुसार रु.४,७३,६९,२८०/- इतक्या खर्चाचे अंदाज तयार केले आहेत. हे खर्चाचे अंदाज कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग-२, नागपूर, आणि अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडल, नागपूर, यांनी साक्षांकित केले आहेत.

३. उक्त खर्चाचे अंदाज सार्वजनिक बांधकाम विभागाने तपासले आहेत व ते रु.५४२.५६ लक्ष असे सुधारले आहेत.

४. त्या अनुसार, पोलीस ठाणे, कोंढाळी, ता.काटोल, जि. नागपूर, येथे पोलीस अधिकारी यांच्याकरिता दोन व पोलीस कर्मचारी यांच्याकरिता २० निवासस्थाने यांचे बांधकाम करण्याकरिता रु.५४२.५६ लक्ष इतक्या खर्चाच्या अंदाजास, पुढील अटींवर, याद्वारे मान्यता प्रदान करण्यात येत आहे :-

अटी :-

१) बांधकामाचा नमुना नकाशा, मांडणी नकाशा आणि विस्तृत नकाशा यांना वास्तुविशारदाकडून मंजूरी घेऊनच काम सुरु करावे.

२) काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी.

3) ढोबळ स्वरूपात धरण्यात आलेल्या तरतुदींबाबत विस्तृत खर्चाचे अंदाज मंजूर करुनच काम हाती घ्यावे.
4) प्रत्यक्ष काम करताना शासन निर्णय, पर्यावरण विभाग, क्र.इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/तां.क.१, दिनांक १०.०१.२०१४, अनुसार कार्यवाही करावी.

**५.** उक्त कामासाठी येणारा खर्च हा गृह विभाग- मागणी क्र. बी-१०, मुख्यलेखशीर्ष ४०५५, पोलीस यांवरील भांडवली खर्च, २०७ राज्य पोलीस, (००) (०३) जिल्हा पोलीस (राज्याचा हिस्सा २५ टक्के) (४०५५ ००३६) (योजनेतर), ५३, मोठी बांधकामे, या खाली सन २०१६-१७ मध्ये उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**६.** हे ज्ञापन सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३१६/इमा-२, दिनांक २७.०९.२०१६, अन्वये मिळालेल्या सहमतीने आणि दिनांक २१.०३.२०१७ रोजी मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली पार पडलेल्या सचिव समितीच्या बैठकीत मिळालेल्या मंजुरीने निर्गमित करण्यात येत आहे.

**७.** हे शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक २०१७०४०६१५१३०७३१२९ असा आहे. हे ज्ञापन डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Gopal Borse

Digitally signed by Swapnil Gopal Borse
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=66835707253ff77ef0e333eb3ad582f9b876d443b2654088832e43dcad21c52a, cn=Swapnil Gopal Borse
Date: 2017.04.06 15:13:48 +05'30'

**( स्वप्नील गोपाल बोरसे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

**प्रत :-**

1) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग (व्यय-७/विनियम), मंत्रालय, मुंबई.
2) प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई.
3) पोलीस अधीक्षक, नागपूर (ग्रामीण).
4) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडल, नागपूर.
5) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग-२, नागपूर.
6) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.
7) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, नागपूर.
8) निवड फाईल (पोल-७).